नागरी भागातील अनधिकृत नळ जोडण्यांबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक विपआ-२०१५/प्र.क्र.३१८/नवि-२०**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
**दिनांक:- २९ ऑक्टोबर, २०१५.**

**शासन परिपत्रक:-**

राज्यात नागरी भागात महानगरपालिका किंवा नगरपालिकांच्या मार्फत अधिकृत नळ जोडण्यांव्दारे पाणी पुरवठा केला जातो. त्यानुसार नागरी स्थानिक संस्थांच्या कार्यक्षेत्रात संबंधीत नागरी स्थानिक संस्थांकडून परवानगी घेऊन अधिकृतरित्या नळ जोडणी घेणे आवश्यक आहे.

२. सर्वश्री संजय केळकर व इतर विधान परिषद सदस्य यांनी सन २००९ च्या दुसऱ्या (पावसाळी) अधिवेशनात महाराष्ट्र विधान परिषद नियम ९३ अन्वये दिलेल्या स्थगन प्रस्तावावरील चर्चेच्या वेळी असे नमूद करण्यात आले की, महानगरपालिका क्षेत्रात सरसकट अनधिकृतपणे नळ जोडण्या झालेल्या असून त्यामुळे जे नागरिक अधिकृतरित्या नळ जोडणी घेतात व त्यासाठी पाणीपट्टी भरतात त्यांच्यावर अन्याय होतो. त्याचप्रमाणे त्यामुळे महानगरपालिकांना पाणीपट्टीपासून अपेक्षित असलेल्या पाणी पट्टीपासून वंचित राहावे लागते. त्या पार्श्वभूमीवर महानगरपालिका/ नगरपालिका क्षेत्रात असणाऱ्या अनधिकृत नळ जोडण्याच्या संदर्भात कालबध्द व ठोस कार्यवाही करण्याच्या सूचना द्याव्यात असे सूचित करण्यात आले.

३. त्यानुसार अशाप्रकारच्या सूचना सर्व महानगरपालिकांना देण्यात येतील असे शासनातर्फे आश्वासन देण्यात आलेले होते.

४. उपरोक्त पार्श्वभूमीवर राज्यातील सर्व महानगरपालिका /नगरपरिषदा / नगरपंचायती यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील अनधिकृत नळ जोडण्याचा आढवा घ्यावा व त्यांच्यावर नियमानुसार आवश्यक कार्यवाही करण्याकरीता विशेष कालबध्द कार्यक्रम राबवावा.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०१५१०२९१५०२३८७१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2015.10.29 15:06:34 +05'30'

**( ज. ना. पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव-१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४) सचिव-२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५) आयुक्त, सर्व महानगरपालिका
६) आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
७) मुख्याधिकारी, संबंधित नगरपरिषदा / नगर पंचायत
८) निवडनस्ती (नवि-२०), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई